**पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, बारामती या संस्थेस सन २०२४-२५ या वित्तीय वर्षात यंत्रसामुग्री व साधनसामुग्री खरेदीस प्रशासकीय मान्यता.**

**महाराष्ट्र शासन**
**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक : यंत्रख-२०२५/प्र.क्र.१०३/प्रशा-१,**
गोकुलदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन गो.ते.संकुल,
९ वा मजला, मंत्रालय, मुंबई -४०० ००१.
दिनांक : १४ फेब्रुवारी, २०२५.

**वाचा :** आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्रमांक : संवैशिवसं/यंसाख/म/बायोमेडीकल वेस्ट/प्रमा/१२४२ /२०२५, दिनांक : १२.०२.२०२५.

**शासन निर्णय :-**

विभागाच्या नियंत्रणाखालील पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, बारामती या संस्थेस राज्य योजनेंतर्गत अनुदानातून खालील तक्त्यात नमूद केलेली यंत्रसामुग्री व साधनसामुग्री खरेदी करण्यास एकूण रुपये ६,९४,००,०००/- (अक्षरी रुपये सहा कोटी चौऱ्यान्नव लक्ष) इतक्या रक्कमेस या शासन निर्णयान्वये पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | नाव | नग संख्या | प्रति नग किंमत | एकूण किंमत |
|---|---|---|---|---|
| १. | बायोमेडीकल वेस्ट डिस्पोजेबल | ०२ | ३,४७,००,०००/- | ६,९४,००,०००/- |
| | एकूण अंदाजित किंमत | | | ६,९४,००,०००/- |

**अटी :-**

१) सदर प्रशासकीय मान्यता राज्य योजनेंतर्गत पुरवणी मागणीद्वारे उपलब्ध होणाऱ्या तरतूदीमधून निधीतून करण्यात येत आहे.

२) सदर विषयी "शासकीय विभागाने करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची नियमपुस्तिका" याबाबत उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६ व अनुषांगिक शासन निर्णयांमध्ये नमूद केलेल्या विहीत कार्यपध्दतीचे अनुपालन करण्यात यावे.

३) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे खरेदी प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावेत. सदर दर हे बाजारभावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने याबाबींचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबतची खातरजमा आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) तसेच संबंधित अधिष्ठाता यांनी करावी.

४) सदर यंत्रसामुग्रीची विनिर्दिष्टे (Technical specification) व्यापक, सर्वसमावेशक असून त्यानुसार साधनपुरवठा करु शकणारे किमान तीन उत्पादक/पुरवठादार यांचेकडून तीन निविदा प्राप्त होऊ शकतील अशा प्रकारची असावीत. तसेच, सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल, अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात आल्यानंतरच सदर बाबींची खरेदी प्रक्रिया करण्यात यावी. तसेच सदर मशीनचे जैविक घनकचरा विल्हेवाटी संदर्भात अवलंबण्यात येणारी कार्यपध्दती सुनिश्चित करुन घेण्याची जबाबदारी आयुक्त आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) व संबंधित अधिष्ठाता यांची राहील.

५) प्रस्तावित यंत्रसामुग्रीचा समावेश इतरत्र कोणत्याही प्रस्तावात अंतर्भूत केलेला नसल्याबाबत/खरेदीची व्दिरुक्ती होणार नाही व सदर साधनसामुग्री संबंधित संस्थेस आवश्यक असल्याबाबत आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) व संबंधित अधिष्ठाता यांनी खात्री करावी.

६) सदर विषयी यंत्रसामुग्री खरेदीबाबत निर्णय घेताना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या लेखाशिर्षाखाली मंजूर अनुदानाच्या तरतूदीपेक्षा जास्त खर्च केला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

७) मुख्य यंत्र व त्यांचे सुटे भाग (Accessories) यांच्या किंमती भिन्न दर्शविणे आवश्यक राहील.

८) सदर विषयी यंत्रसामुग्री खरेदीबाबत निर्णय घेताना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या लेखाशीर्षाखाली मंजूर अनुदानाच्या तरतूदीपेक्षा जास्त खर्च केला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

९) सदर उपकरणामध्ये Microwave हे तंत्रज्ञान जैव कचऱ्याच्या प्रक्रियासाठी वापण्यात येत असल्यास वैद्यकीय नियंत्रण तसेच Bio Medical Waste Management Rules, २०१६ मधील सर्व अटी व शर्तीचे पालन करण्याची जबाबदारी आयुक्त, वैद्यकीय शिक्षण, मुंबई व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र वैद्यकिय वस्तू खरेदी प्राधिकरण, मुंबई तसेच खरेदी पुरवठादार यांची राहील.

१०) सदर खरेदी करताना National Pollution Control Board आणि Maharashtra Pollution Control Board यांच्या मार्गदर्शक सुचनांचे काटेकोरपणे पालन करण्याची संपुर्ण जबाबदारी आयुक्त, वैद्यकीय शिक्षण, मुंबई व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र वैद्यकिय वस्तू खरेदी प्राधिकरण, मुंबई तसेच खरेदी पुरवठादार यांची राहील.

११) संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

१२) उपरोक्त शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक ०१.१२.२०१६ मधील परिच्छेद क्रमांक ३.१.२ "किंमतीचा अंदाज व किंमतीचा वाजवीपणा" या शीर्षकाखालील परिच्छेद क्रमांक ३.१.२.१ मधील तरतूदीचे राज्यस्तरीय खरेदी समितीने अनुपालन करावे.

१३) सदर यंत्रसामग्री खरेदी प्रक्रिया महाराष्ट्र वैद्यकिय वस्तू खरेदी प्राधिकरण, मुंबई मार्फत करण्यात यावी.

**२.** या प्रयोजनासाठी येणारा खर्च संबंधित संस्थेस खालील लेखाशीर्षातंर्गत मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक : एस-०४

| | | |
|---|---|---|
| ४२१० | - | वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च |
| ०३ | - | वैद्यकीय शिक्षण, प्रशिक्षण व संशोधन |
| १०५ | - | विषमचिकित्सा-राज्ययोजनांतर्गत योजना |
| (००) (३७) | - | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय यांचे बळकटीकरण व दर्जा वाढ करणे व यंत्रसामुग्री |
| ५२ | - | यंत्रसामुग्री व साधनसामुग्री (४२१० १६२९) |

**३.** सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/ विनियम, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१, उप विभाग-२, अनुक्रमांक-३, नियम क्रमांक-७ अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

**४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०२१४१५५९०९१९१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUDHIR JAYA SHETTY

Digitally signed by SUDHIR JAYA SHETTY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e8621e5917d8305, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E9D37D499A521B728AEB3DC8EC38B759420308B9FD7816002B4AF0FFBF1111D7, cn=SUDHIR JAYA SHETTY
Date: 2025.02.14 16:00:10 +05'30'

**( सुधीर शेट्टी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) आयुक्त (वै.शि.), वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन संचालनालय, मुंबई.
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र वैद्यकिय वस्तू खरेदी प्राधिकरण, मुंबई
३) महालेखाकार - १ ( लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई.
४) संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
५) अधिष्ठाता, पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, बारामती.
६) अधिदान व लेखाधिकारी ,मुंबई.
७) निवासी लेखाधिकारी, मुंबई.
८) निवडनस्ती (प्रशा-१).